राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानाच्या (NMAET) कृषि विस्तार उप अभियानातंर्गत, राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) योजना सन २०१९-२० मध्ये राबविण्यासाठी सर्वसाधारण प्रवर्गासाठीचा दुस-या हप्त्याचा केंद्र हिश्याचा रु. १४१०.१९ लक्ष व राज्य हिश्याचा रु.९४०.१२ लक्ष निधी वितरीत करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१९/प्र.क्र.६६/३-अे,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक : २१ नोव्हेंबर, २०१९

वाचा -

१) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१९/प्र.क्र. ६६/३-अे , दि.१०.७. २०१९

२) केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय यांचे पत्र क्र. एफनं.३६-२८/२०१७- अेई, विस्तार कक्ष, दि.३०.१०.२०१९

३) संचालक, आत्मा यांचे पत्र क्र.आत्मा/ प्र.क्र.०१/लेखा /निवि/राही/८९३/१९, दि.१.११.२०१९

प्रस्तावना -

सन २०१९-२० मध्ये केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानाच्या (NMAET) कृषि विस्तार उप अभियानातंर्गत, राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) या योजनेच्या अंमलबजावणीस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे

केंद्र शासनाने सन २०१९-२० मध्ये सदर योजनेकरिता दि.३०.१०.२०१९ रोजीच्या पत्रान्वये केंद्र हिश्याचा सर्वसाधारण प्रवर्गासाठी रु. १४१०.१९ लक्ष निधी वितरीत केला आहे. त्यानुषंगाने समरुप राज्य हिश्याचा रु.९४०.१२ लक्ष गृहीत धरता सद्यस्थितीत, एकूण रु. २३५०.३१ लक्ष निधी सर्वसाधारण प्रवर्गासाठी चालू वर्षी दुस-या हप्त्यात वितरीत करता येणे शक्य आहे. त्यानुषंगाने, या शासन निर्णयान्वये सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी सर्वसाधारण प्रवर्गाचा निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे -

**शासन निर्णय :**

१ सन २०१९-२० मध्ये केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानाच्या (NMAET) कृषि विस्तार उप अभियानातंर्गत, राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) या योजनेच्या अंमलबजावणीसाठी चालू वर्षाकरिता सर्वसाधारण प्रवर्गासाठी केंद्र हिश्याचा रु. १४१०.१९ लक्ष (रुपये चौदा कोटी दहा लक्ष एकोणीस हजार फ़क्त) निधी मागणी क्र.डी-३,२४०१ पीक संवर्धन,१०९ विस्तार व

शेतकरी प्रशिक्षण, (०१) माहिती व प्रचार, (०१) (४४) -कृषि उन्नती योजना- कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणाकरिता सहाय्य (आत्मा) -उप अभियान (केंद्र पुरस्कृत योजना) ( केंद्र हिस्सा ६० %) (२४०१ ४४४५),३३ अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली दुस-या हप्त्यात कृषि आयुक्त कार्यालयास अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२ सन २०१९-२० मध्ये केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानाच्या (NMAET) कृषि विस्तार उप अभियानातंर्गत, राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) या योजनेच्या अंमलबजावणीसाठी चालू वर्षाकरिता सर्वसाधारण प्रवर्गासाठी राज्य हिश्याचा रु.९४०.१२ लक्ष ( रुपये नऊ कोटी चाळीस लक्ष बारा हजार फ़क्त ) निधी मागणी क्र.डी-३,२४०१ पीक संवर्धन,१०९ विस्तार व शेतकरी प्रशिक्षण, (०१) माहिती व प्रचार, (०१) (४३) -कृषि उन्नती योजना- कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणाकरिता सहाय्य (आत्मा) -उप अभियान (केंद्र पुरस्कृत योजना) (राज्य हिस्सा ४० %) (२४०१ ४४३६),३३ अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली दुस-या हप्त्यात कृषि आयुक्त कार्यालयास अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३ आत्मा कार्यक्रम सन २०१९-२० साठी सर्वसाधारण या प्रवर्गासाठी वितरीत करण्यात आलेला निधीचा केवळ त्याच प्रवर्गासाठी वापर करण्यात यावा.

४ सन २०१९-२० मध्ये राज्यात सदर योजनेची अंमलबजावणी व सनियंत्रण करण्याच्या दृष्टिने, पुढील अधिकाऱ्यांना नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **स्तर** | **नियंत्रण अधिकारी** | **आहरण व संवितरण अधिकारी** |
|---|---|---|---|
| १. | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषी, आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. |
| २. | जिल्हास्तर | संबंधित प्रकल्प संचालक आत्मा | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी. |

५ या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला सर्व निधी सर्व जिल्हयांना पीएफ़एमएस प्रणालीव्दारे वितरीत करावा.

६ हा शासन निर्णय वित्त परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र. ९२/अर्थ-३, दिनांक ८ जूलै, २०१९ नुसार या विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११२११२१४३१७१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Ashok Maroti Atram
Date: 2019.11.21 12:17:03 +05'30'

**( अशोक आत्राम )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रती -**

१) सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२) आयुक्त (कृषि) तथा राज्य नोडल अधिकारी आत्मा, कृषि आयुक्तालय,पुणे
३) संचालक ( आत्मा ), कृषि आयुक्तालय,पुणे
४) सर्व जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष आत्मा नियामक मंडळ ( मुंबई शहर व मुंबई उपनगर वगळून)
५) सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे
६) सर्व विभागीय कृषि सहसंचालक
७) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा उपाध्यक्ष आत्मा नियामक मंडळ
८) संचालक वनामती, नागपूर
९) उप संचालक, आत्मा, सामेती, पुणे
१०) सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
११) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
१२) सर्व प्रकल्प संचालक (आत्मा),
१३) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१५) महालेखापाल - १/२(लेखा परिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर
१६) वित्त विभाग (का.व्यय-१) (अर्थसंकल्प-१२)(अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.३२
१७) नियोजन विभाग, कार्यासन - १४१४, १४३१, मंत्रालय, मुंबई.३२
१८) कार्यासन अधिकारी, २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९) निवड नस्ती (कार्यासन-३अे).